**पुणे वन विभागातील भांबुर्डा वनपरिक्षेत्रामधील मौजे बावधन स.नं. २१ येथील वन्यप्राण्यांकरीता ट्रांझिट ट्रिटमेंट सेंटरच्या विविध कामांच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.डब्ल्युएलपी १२.२३/प्र.क्र.३९१/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०७ मार्च, २०२४

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम (भाग-२), दिनांक २०.०९.२०१९.
२. सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, क्रमांक संकीर्ण-२०१९/प्र.क्र. १०/इमा-२, दिनांक २५.०९.२०१९
३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्यूएलपी ०५.१८/प्र.क्र. २०४/फ-१, दिनांक २०.११.२०१८
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-२४/लेखा/प्र.क्र. ५५/४४४/२०२३-२४, दिनांक १५.०९.२०२३.
५. उप वनसंरक्षक (प्रादेशिक), पुणे यांचे पत्र क्रमांक :- कक्ष २ (२)/योजना/१६२५/२०२३-२४, दिनांक ०५.०२.२०२४.

**प्रस्तावना:-**

पुणे वनवृत्तातील मौजे बावधन सर्व्हे क्र.२१, ता. मुळशी येथील २२ एकर क्षेत्रावर जखमी व अपंग वन्यप्राण्यांकरीता वन्यप्राणी उपचार केंद्र (ट्रांझिट ट्रिटमेंट सेंटर) स्थापन करण्यास संदर्भ क्रमांक ३ च्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान केली आहे. त्याअनुषंगाने वन्यप्राण्यांकरीता ट्रांझिट ट्रिटमेंट सेंटरकरीता पाणी पुरवठ्यासाठी दाब नलिका टाकण्याच्या कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये विनंती करण्यात आली होती. सदर अंदाजपत्रकामध्ये महाराष्ट्र जिवन प्राधिकरण यांचे दरसुचिनुसार सुधारणा करण्याबाबत सुचित करण्यात आले होते. त्यानुसार उप वनसंरक्षक (प्रादेशिक), पुणे यांनी संदर्भ क्रमांक ५ च्या पत्रान्वये रु. ८३,६०,९२०/- इतक्या रक्कमेचे सुधारीत अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केले आहे.

**शासन निर्णय :-**

पुणे वन विभागातील भांबुर्डा वनपरिक्षेत्रामधील मौजे बावधन स.नं. २१ येथील वन्यप्राण्यांकरीता ट्रांझिट ट्रिटमेंट सेंटरकरीता पाणी पुरवठ्यासाठी दाब नलिका टाकण्याच्या कामाच्या रु. ८३,६०,९२०/- इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग क्र. ०१ पुणे यांनी दिलेल्या संहमतीस व संदर्भ क्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकिय

मान्यता प्रदान करण्याच्या अनुषंगाने संबंधित प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे :

i. सदर कामाच्या बांधकामाचा खर्च योजनेंतर्गत मंजूर तरतूदीतून उपलब्ध असलेल्या नियतव्ययातून करण्यात यावा.
ii. अंदाजपत्रकातील बाबी मूळ ढोबळ बाबींच्या कार्यान्वयनाकरीता आहेत याची अंमलबजावणी पूर्वी खात्री करावी.
iii. सदरहू कामे करताना वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत तरतूद तसेच प्रचलित कायदे / नियमातील तरतूदींचा भंग होणार नाही तसेच कोणतीही अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

सदरचा शासन निर्णय हा वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम (भाग-२), दिनांक २०.०९.२०१९ वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका अंतर्गत परिच्छेदांखालील प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकारांमधील परिच्छेद क्र. १३४ (१), १३४ (२) आणि १३४ (३) मधील विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१११३०२०७६३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5712CE2D7A095C22E97EBB8F03C668B12EBA1DB0DD8E284883B7BD7FA74DA65D, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2024.03.11 13:18:37 +05'30'

**( सिध्देश सावर्डेकर )**
**विशेष कार्य अधिकारी**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), पुणे.
५. उप वनसंरक्षक (प्रादेशिक), पुणे.
६. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. कार्यासन फ-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)

*******